**सन २०२४-२५ चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर यांना (२४१५-१०७७) या योजनेंतर्गत ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) करिता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.३८/फ-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २२ ऑगस्ट, २०२४

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.१.४.२०२४
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४
३. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/चाबाप्र/प्र.क्र.०५/७५/२०२४-२५, दिनांक १८.०४.२०२४
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांकित दिनांक ०२.०५.२०२४
५. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२१/२०४/२०२४-२५, दिनांक १२.०६.२०२४

**प्रस्तावना :-**

सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात "चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर (२४१५-१०७७)" या लेखाशिर्षाअंतर्गत ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) रु.४१५०.०० लक्ष व ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) रु.३५०.०० लक्ष असे एकूण रु.४५००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित आहे. वाचा येथील नमूद क्र.४ च्या शासन निर्णयान्वये ३६- सहाय्यक अनुदाने (वेतन) रु.११६.६६ लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या वाचा येथील नमूद क्र.१ व २ येथील दि. १.४.२०२४ व दि. २५.०७.२०२४ रोजीच्या परिपत्रकान्वये वित्तीय वर्ष सन २०२४-२५ च्या अर्थसंकल्पीय तरतूदींची मासिक निधी विवरणपत्रे अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर विभागास सन २०२४-२५ च्या प्रथम नऊ माहीकरिता (डिसेंबर, २०२४ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतुदीच्या परिच्छेद क्र.३ मध्ये नमूद उद्दिष्टासाठी ६०% च्या मर्यादेत आणि उर्वरित उद्दिष्टांसाठी ७०% मर्यादेत तसेच केंद्र पुरस्कृत योजनेतील केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा प्रथम नऊ माहीकरिता (डिसेंबर, २०२४ अखेर) ६०% च्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्याच्या अनुषंगाने सूचना देण्यात आलेल्या आहेत. सदर मासिक विवरणपत्रानुसारचा निधी एप्रिल ते डिसेंबर, २०२४ या कालावधीमध्ये पुढे/मागे ओढून घेण्याची सुविधा अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) देण्यात आली आहे. तसेच वित्त विभागाच्या सदर दिनांक २५.०७.२०२४ रोजीच्या परिपत्रकातील परिच्छेद क्र.३ मध्ये नमूद केलेल्या उद्दीष्टाकरीता प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी याबाबतचे प्रस्ताव ठोस समर्थनासह आवश्यकतेनुसार नियोजन विभागामार्फत वित्त विभागास सादर करण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत.

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या वाचा क्र.५ येथील पत्रान्वये ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) रु.९३६.२७ लक्ष इतक्या रकमेचा चालू बाब प्रस्ताव प्राप्त झाला आहे. त्यानुसार सदर प्रस्तावाकरीता अनुदान उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे वाचा क्र.५ नुसार सादर केलेला प्रस्ताव व वित्त विभागाचे वाचा येथील क्र.१ व २ चे परिपत्रक विचारात घेता, चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर (२४१५-१०७७) या योजनेतून सदर शासन निर्णयासोबतच्या “प्रपत्र-अ” मधील तक्त्यात दर्शविण्यात आलेल्या कामांकरीता ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) अंतर्गत रु.९३६.०० लक्ष इतका निधी खालील अटी व शर्तीचे अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.
२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.
३. सदर योजनांतर्गत प्रस्तावित कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबांबीवर निधी खर्ची टाकण्यात यावा.
४. नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.
५. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.
६. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, विहित खरेदी प्रक्रिया नियमावली, ई-निविदा कार्यपध्दती, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करावे.
७. सदर आर्थिक वर्ष २०२४-२५ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.
८. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.
९. संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांना उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.
१०. उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

११.सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक १.४.२०२४ व २५.०७.२०२४ रोजीचे परिपत्रकातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

१२.सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

१३.सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) कायदा १९८० मधील तरतुदींचा भंग होणार नाही तसेच सर्वोच्च न्यायालय/उच्च न्यायालय/केंद्र शासनाच्या व्याघ्र संवर्धन प्राधिकरण यांनी दिलेल्या मार्गदर्शक सुचना/आदेशाची अवहेलना होणार नाही, याची सुध्दा दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ.सं.क्र.२८१/२०२४, दिनांक १२.०८.२०२४ व वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.३२४/२०२४/व्यय-१०, दिनांक २०.०८.२०२४ अन्वये तसेच वित्त विभागाच्या दिनांक ०१.०४.२०२४ व २५.०७.२०२४ चे परिपत्रक आणि वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/ २०१३/ विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२२१४४४४६१०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK VIJAY HOSHING

Digitally signed by VIVEK VIJAY HOSHING
DN: c=IN, o=Personal, title=4179, pseudonym=1331426029574870 84g5f8e27R5OJA8P, 2.5.4.20=d2eb76cc3763a845a8edf9b9dde07f42d90c6bc17db755d4af91632f6c0b678e, postalCode=414001, st=MAHARASHTRA, serialNumber=3b1afe499c80878329fbb017e4922f7356cc5edc76102e8ff88c7b9a67a322d9, cn=VIVEK VIJAY HOSHING
Date: 2024.08.22 15:02:47 +05'30'

**( विवेक होशिंग )**
**उप सचिव (वने) महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), चंद्रपूर.
५. मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. संचालक, चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन अकादमी चंद्रपूर.
७. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८. सह सचिव/उपसचिव,वित्त विभाग (अर्थ-३)/(व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
९. उप सचिव, नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
१०.कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११.कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ (निवडनस्ती)

**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.३८/फ-९, दिनांकः- २२ ऑगस्ट, २०२४**

**सोबतचे "प्रपत्र - अ"**

| अ.क्र. | बाबनिहाय काम | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचा निधी (रु.लक्ष) |
|---|---|---|
| १ | वन प्रबोधिनी विभागामार्फत करण्यात येणाऱ्या विविध कामाकरीता मजूर लावणे, संगणक परिचालक, कर्मचारी व इतर कामाकरीता कंत्राटी पध्दतीवर मनुष्यबळ उपलब्ध करणे | १५२.६४ |
| २ | कंत्राटी पध्दतीवर अधिकारी नेमणूक करणे | १११.४५ |
| ३ | मानव वन्यजीव संघर्ष/धोका टाळणेसाठी वर्षातुन तीन वेळा परिसरातील झाडोरा कटाई/सफाई करणे | ३.८६ |
| ४ | वन प्रबोधिनी येथे Facility Management Services पुरवठा करणे (House Keeping) | २३८.०४ |
| ५ | मेस्को (MESCO) या संस्थेद्वारे सुरक्षा व्यवस्था पुरविणे | १००.०० |
| ६ | महानगर पालिका मालमत्ता कर | १०.०० |
| ७ | वन प्रबोधिनी विद्युत बिल | २४०.०० |
| ८ | चंद्रपूर वन प्रबोधिनी अंतर्गत असलेले स्व.उत्तमराव पाटील वनउद्यान देखभाल व दुरुस्ती कामे (ऑक्सीजन पार्क व जॉगर्स पार्क) | २०.०१ |
| ९ | कार्यालयीन लेखन सामुग्री खरेदी व संगणकीय खर्च झेरॉक्स, toner refilling व इतर कामे | ३०.०० |
| १० | शासकीय वाहनाकरीता डिझेल पेट्रोल खरेदी व परिक्षण | ३०.०० |
| | **एकूण** | **९३६.००** |

VIVEK VIJAY HOSHING

Digitally signed by VIVEK VIJAY HOSHING
DN: c=IN, o=Personal, title=4179,
pseudonym=13314260295748708 4g5f8e27R5OJA8P,
2.5.4.20=d2eb76cc3763a845a8edf9b9dde07f42d90c6bc17db755d4af91632f6c0b678e, postalCode=414001, st=MAHARASHTRA,
serialNumber=3b1afe499c80878329fbb017e4922f7356cc5edc76102e8ff88c7b9a67a322d9, cn=VIVEK VIJAY HOSHING
Date: 2024.08.22 15:03:12 +05'30'

( विवेक होशिंग )
उप सचिव (वने) महाराष्ट्र शासन